कु. भारती तुकाराम ओंबळे, परिविक्षाधीन
उपजिल्हाधिकारी (गट-अ) यांचेकरीता १
अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-२०१४ /प्र.क्र. २४३/ई-८,**
जागतिक व्यापार केंद्र, सेंटर क्र.१ इमारत, ३२ वा मजला,
कफ परेड,कुलाबा, मुंबई - ४०० ००५.
तारीख: १५/०१/२०१५

वाचा

१) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ११/०७/२०१२.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्रमांक-नियुक्ती-०२१४/प्र.क्र.२८ /ई-२, दिनांक २७/०८/२०१४.

**शासन निर्णय**

मुंबई येथे दिनांक २६ ते २९ नोव्हेंबर, २००८ या कालावधीत झालेल्या दहशतवादी हल्ल्यात शहीद झालेल्या पोलिस सेवेतील व्यक्तींच्या कुटुंबियांपैकी एका व्यक्तीस गट -अ किंवा गट-ब मधील पदावर शासन सेवेत सामावून घेण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग, आदेश, क्रमांक अकंपा-१००८/प्र.क्र. २४८/०८/आठ, दिनांक २०/०१/२००९ अन्वये धोरणात्मक निर्णय घेण्यात आला आहे. याच निर्णयाच्या आधारे कु. भारती तुकाराम ओंबळे यांनी उपजिल्हाधिकारी गट -अ संवर्गाच्या पदावर सरळ सेवेने थेट नियुक्ती देण्याबाबत शासनास विनंती केली होती. त्यांच्या या विनंतीस अनुसरुन शासनाने संदर्भीय क्र. २ च्या शासन निर्णयान्वये कु. भारती तुकाराम ओंबळे यांची परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी गट -अ या पदावर सरळ सेवेने वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० + ग्रेड वेतन ५४०० नियुक्ती केली आहे. त्या अनुषंगाने संबंधित अधिकारी यांनी आपल्या पदाचा कार्यभार स्वीकारल्याच्या दिनांकापासून दोन वर्षासाठी परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी (गट-अ) याचे १ अधिसंख्य पद निर्माण करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे

२. शासनाने वेळोवळी काढलेल्या आदेशानुसार उपरोक्त परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी (गट-अ) यांना महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

३. परिविक्षाधीन उपजिल्हाधिकारी (गट-अ) यांच्या एका अधिसंख्य पदावर होणारा खर्च "मागणी क्र. सी-१,२०५३-जिल्हा प्रशासन, (००) ०९३ जिल्हा आस्थापना, (०१) सर्वसाधारण आस्थापना, (०१)(०१) आयुक्त कोकण (२०५३ ००२८) बाब क्र. ०१-वेतन" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येवून सन २०१४-१५ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ११/०७/२०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११५१४०५२८७६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.01.15 15:36:42 +05'30'

**( चं. नि. पाडळे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
२. जिल्हाधिकारी, पालघर.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर.
४. प्रधान महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ) महाराष्ट्र, मुंबई.
५. कक्ष अधिकारी, व्यय-९/वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१/ ई-२, महसूल व वन विभाग, कफ परेड, मुंबई -०५.
७. निवड नस्ती, कार्यासन -ई-८, महसूल व वन विभाग, कफ परेड, मुंबई -४०० ००५.